डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठाच्या आस्थापनेवरील, प्रकल्पग्रस्त रोजंदारी तत्वावरील कर्मचाऱ्यांना प्रकल्पग्रस्तांकरिताच्या विशेष भरती मोहिमे अंतर्गत उच्चतम वयोमर्यादेत शिथिलता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,
शासन निर्णय क्रमांक: पंदेवि-१३२५/प्र.क्र.६१/६-अे (E-Comp No.1020752)
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १९ मे, २०२५.

**वाचा:-**

१) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र.कृषिवि ३७२३/प्र.क्र.१६९/६-अे, दि.१४.१०.२०२४.
२) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र.संकिर्ण १४१५/प्र.क्र.१२/६-अे, दि.२४.०७.२०१५.

**प्रस्तावना:-**

राज्य मंत्रिमंडळाच्या दि.१०.१०.२०२४ रोजी संपन्न झालेल्या बैठकीत प्राप्त झालेल्या मान्यतेस अनुसरून संदर्भाधीन शासन निर्णयाद्वारे पुढीलप्रमाणे सूचना देण्यात आल्या होत्या :-

i. राज्यातील कृषि विद्यापीठांतील, गट-क व गट-ड संवर्गातील रिक्त पदे त्याच कृषि विद्यापिठाने बाधित प्रकल्पग्रस्तांमधून भरण्याकरिता, विशेष भरती प्रक्रिया राबविण्यास एक विशेष बाब म्हणून मान्यता देण्यात आली.

ii. एकूण भरावयाच्या पदांपैकी ५० टक्के पदे ही त्याच कृषि विद्यापीठांतर्गत बाधित झालेल्या प्रकल्पग्रस्तांकरिता राखीव ठेवण्यात यावीत.

iii. ज्या प्रकल्पग्रस्तांनी प्रत्यक्षात संबंधित कृषि विद्यापीठाकरिता जमिनी दिल्या असतील, तेच प्रकल्पग्रस्त सदर विशेष भरती मोहिमेकरिता पात्र असतील.

iv. सदर विशेष भरती मोहिम राबविताना सामाजिक आरक्षण व समांतर आरक्षण याची सांगड घालण्यात यावी.

वरील सूचनांस अनुसरून, डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला येथील गट क व गट ड मधील प्रकल्पग्रस्तांमधून भरावयाच्या पदांकरिता भरती प्रक्रियेच्या जाहिराती डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला यांचेकडून प्रसिद्ध करण्यात आल्या आहेत. सदर जाहिरातींमध्ये प्रकल्पग्रस्तांकरिता कमाल वयोमर्यादा ४५ वर्ष इतकी विहित करण्यात आली आहे. मात्र,

डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला च्या क्षेत्रांवर काम करणारे प्रकल्पग्रस्त रोजंदारी मजूर हे, गेल्या २० वर्षापासुन रोजंदारीवर कार्यरत आहेत. परिणामी, त्यांनी कमाल वयोमर्यादा ओलांडली असल्याने, वयाधिक्यामुळे ते भरती प्रक्रियेत भाग घेण्यास पात्र ठरत नाहीत. यास्तव, अशा मजुरांना प्रकल्पग्रस्तांच्या विशेष भरती प्रक्रियेत सहभागी होण्यासाठी कमाल वयोमर्यादेत शिथीलता देण्याबाबत शासनास निवेदने प्राप्त झाली होती. त्यानुसार, याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या मान्यतेसाठी सादर करण्यात आला होता. सदर प्रस्तावास प्राप्त झालेल्या शासनमान्यतेनुसार, शासन निर्णय निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला च्या आस्थापनेवर प्रदीर्घ काळ रोजंदारी तत्वावर कार्यरत असलेल्या प्रकल्पग्रस्त मजुरांकरिता, विद्यापीठाकडून संदर्भाधीन शासन निर्णयानुसार राबविण्यात येत असलेल्या प्रकल्पग्रस्तांकरिताच्या विशेष भरती मोहिमे अंतर्गत उच्चतम वयोमर्यादेची अट शिथील करण्यात येत आहे.

प्रस्तुत शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक क्र.२०२५०५१९१९२४३२२५०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

ROHIDAS BUDHA KHOKALE

Digitally signed by ROHIDAS BUDHA KHOKALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=cbb8829235745abd4400f25653c09fa67e73640a5888c510c5bce0d96312b642, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=09421AB7DB5D473A27D4F6065F22108CD842EEDC5FD365BDA7137185FB38E7CC, cn=ROHIDAS BUDHA KHOKALE
Date: 2025.05.19 19:51:31 +05'30'

**रोहिदास खोकले**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. राज्यपाल महोदय यांचे सचिव, मलबार हिल, मुंबई,
२) मा. मुख्यमंत्री महोदय यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
३) मा. उप मुख्यमंत्री (नगरविकास व गृहनिर्माण) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
४) मा. उप मुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई,
५) मा. मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
६) मा. विरोधी पक्षनेता, विधान परिषद / विधानसभा, विधान भवन, मुंबई,
७) अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
८) अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई,

९) प्रधान सचिव (कृषी), कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई,
१०) संचालक, महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे,
११) कुलगुरु, डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला,
१२) कुलसचिव, डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला,
१३) महालेखापाल महाराष्ट्र १ / २, (लेखा परीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता) मुंबई / नागपूर,
१४) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
१५) मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई,
१६) उप मुख्य लेखा परीक्षक (वरिष्ठ), स्थानिक निधी लेखा, कोंकण भवन, नवी मुंबई,
१७) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई (३ प्रती),
१८) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
१९) कार्यासन अधिकारी, वित्त विभाग (व्यय-१/सेवा-३), मंत्रालय, मुंबई,
२०) निवड नस्ती, कार्यासन ६-अे कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.